आदिवासी विकास सेवेतील वर्ग-२ मधील
सहाय्यक प्रकल्प अधिकारी / संशोधन
अधिकारी आणि तत्सम संवर्गातील
अधिकाऱ्यांची सन १९९४ ते २००२ पर्यंतची
अंतिम ज्येष्ठता यादी.

**महाराष्ट्र शासन**

**आदिवासी विकास विभाग**

**शासन परिपत्रक क्रमांकः आस्था २०१४/ प्र. क्र. ८/ का. १५**

हुतात्मा राजगुरु चौक, मादाम कामा मार्ग,

मंत्रालय विस्तार, मुंबई-४०० ०३२.

तारीख: १९ ऑगस्ट, २०१४.

वाचा —

1) **शासन निर्णय क्रमांकः सा◌ामन्य प्रशासन विभाग क्र.एसआरव्ही-१०७६/बारा, दि.२१/६/१९८२.**
2) **आदिवासी विकास विभाग शासन परिपत्रक क्रमांकः आस्था-२०१४ /प्र.क्र. ०८/का.१५.दि.६ जुन २०१४**

   आयुक्त, आदिवासी विकास, नाशिक यांचे पत्र क्र.ज्येया -२०१४/प्र.क्रं.१९/का.२(१) , दि.१६/०७/२०१४ .

**शासन परिपत्रक—**

आदिवासी विकास सेवेतील वर्ग - २ मधील सहाय्यक प्रकल्प अधिकारी / संशोधन अधिकारी आणि तत्सम संवर्गातील अधिकाऱ्यांची सन- १९९४ ते २००२ पर्यंतची तात्पुरती सेवाज्येष्ठता यादी संदर्भाधिन क्रं. (२) च्या शासन परिपत्रकान्वये प्रसिध्द करण्यात आलेली होती. सदर परिपत्रकातील परिच्छेद क्रं २ अनुसार सर्व संबंधिताना हरकती व आक्षेप घेण्याची संधी देवून त्यांच्या हरकती ३० दिवसाच्या आत सादर करण्याबाबत कळविण्यात आले होते.

तथापि सदर सेवाज्येष्ठता यादीबाबत संबंधितांची अभिवेदने / निवेदने प्राप्त झालेली नाहीत. असे आयुक्त, आ. वि. नाशिक यांनी कळविले आहे.

संदर्भाधिन क्रं.२ च्या दि.२१/०२/२०११ च्या परिपत्रकाद्वारे प्रसिध्द करण्यात आलेली वर्ग - २ मधील सहाय्यक प्रकल्प अधिकारी / संशोधन अधिकारी आणि तत्सम संवर्गातील अधिकाऱ्यांची सन-१९९४ ते २००२ पर्यंतची तात्पुरती सेवाज्येष्ठता यादी याद्वारे अंतिम करण्यात येत आहे.

सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा संकेताक २०१४०८२२१२२८५५४६२४ असा आहे. हा आदेश डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने.

Shinde Vijay G

Digitally signed by Shinde Vijay G
DN: c=IN, o=Government of Maharashtra, ou=MTD, postalCode=400032, st=Maharashtra, cn=Shinde Vijay G
Date: 2014.08.22 12:28:37 +05'30'

(वि.गं.शिंदे)

कक्ष अधिकारी

प्रत,

१. आयुक्त, आदिवासी विकास, नाशिक,
२. आयुक्त, आदिवासी संशोधन व प्रशिक्षण संस्था, पुणे,
३. अपर आयुक्त, आदिवासी विकास, ठाणे/ नाशिक/ नागपूर/ अमरावती,
४. सर्व सह आयुक्त तथा उपाध्यक्ष, अनुसूचित जमाती प्रमाणपत्र तपासणी समित्या,
५. सर्व प्रकल्प अधिकारी, एकात्मिक आदिवासी विकास प्रकल्प,
६. सर्व संबंधित अधिकारी ( विभागप्रमुख व कार्यालय प्रमुख मार्फत),
७. निवड नस्ती ( का-१५).